शैक्षणिक वर्ष २०१० -११
नवीन बायोटेक्नॉलॉजी महाविद्यालय तसेच अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रम / विषय, तुकड्या, विद्याशाखा इ. मान्यता

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०१०/(२३४/१०)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै २०१०

पहा:- १) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.१.२०१०, व दि. ३.४.२०१० (Task Force)
२) शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.३.२०१०, (Task Force)
३) शासन निर्णय दिनांक १०.७.२००८ (टास्क फोर्स कमिटी- बायोटेक्नॉलॉजी)
४) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्र. एनजीसी/ नावि/ मवि-२-३/बायोटेक/ ३१२७,
दि. ५.७.२०१०

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी शासनाकडे नवीन महाविद्यालय, तसेच अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन अभ्यासक्रम/ विषय, तुकड्या, विद्याशाखा मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करावयाचे असतात, त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी राज्यातील विद्यापीठांकडून बायोटेक्नॉलॉजीचे नवीन महाविद्यालय, तसेच अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रम / विषय, तुकड्या, विद्याशाखा इ. चे प्रस्ताव प्राप्त झाले होते. सदर प्रस्तावांची शासन निर्णय दिनांक ७.८.२००८ अन्वये स्थापित समितीने विहीत केलेल्या निकषांनुसार अनुक्रमे शासन निर्णय व शासन पत्र क्रमांक-एनजीसी२०१०/ (७/१०) / मशि-४, दि. १५.१.२०१०, दि. ३.४.२०१० व दि. १५.३.२०१० अन्वये स्थापित टास्क फोर्स समितीद्वारे छाननी करण्यात आली. टास्क फोर्स समितीचे अभिप्राय / शिफारशी व विद्यापीठाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन बायोटेक्नॉलॉजी महाविद्यालय, नवीन बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रम / विषय, तुकड्या, विद्याशाखा इत्यादींना कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात येत आहे.

### नवीन महाविद्यालय

उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव

| अ.क्र. | संस्था / महाविद्यालयाचे नांव व नियोजित ठिकाण | अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | खांदेश कॉलेज एज्युकेशन सोसायटी, मु.जे महाविद्यालय परिसर, जळगांव<br>मु.जे महाविद्यालय परिसर, जळगांव | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |

## नवीन विषय / अभ्यासक्रम

### मुंबई विद्यापीठ

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नांव | अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | सी.एच.एम. कॉलेज आर्टस, सायन्स अॅन्ड कॉमर्स, उल्हासनगर, जि. ठाणे | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |

### पुणे विद्यापीठ,

| | | |
|---|---|---|
| २ | पुना कॉलेज, २६४७ कॅम्प न्यु मोदिखाना, पुणे | बी.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |
| ३ | अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर स्टेशन रोड, अहमदनगर | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |

### स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड

| | | |
|---|---|---|
| ४ | सायन्स कॉलेज, नांदेड | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |

### राष्ट्र संत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ

| | | |
|---|---|---|
| ५ | सेंट फ्रान्सिस डी सेलेस कॉलेज, नागपूर, जि. नागपूर | बी.एस्सी (बायोटेक्नॉलॉजी ) |
| ६ | डॉ. आंबेडकर कॉलेज, दिक्षाभूमी, नागपूर जि. नागपूर | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |
| ७ | श्री. शिवाजी एज्युकेशन सोसायटी, अमरावती, सायन्स कॉलेज, काँग्रेसनगर, नागपूर | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी ) |

## नवीन अतिरिक्त तुकडी

### मुंबई विद्यापीठ

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नांव | अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | हिंदी विद्या प्रचार समितीचे, रामनिरंजन झुनझुनवाला, महाविद्यालय, घाटकोपर रेल्वे स्टेशन समोर, घाटकोपर (प), मुंबई | प्रथम वर्ष<br>बी.एस्सी (बायोटेक्नॉलॉजी ) - १ |
| २ | बी.एन बांदोडकर विज्ञान महाविद्यालय, ज्ञानद्वीप, चेंदणी बंदर, ठाणे | प्रथम वर्ष<br>बी.एस्सी (बायोटेक्नॉलॉजी ) - १ |

### स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड

| | | |
|---|---|---|
| ३ | राजर्षी शाहू महाविद्यालय, लातूर | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी) -१ |

## नवीन विद्याशाखा

### सोलापूर विद्यापीठ

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नांव | अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | डी.जी.शिंदे कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स ॲन्ड सायन्स, सोलापूर | एम.एस्सी. (बायोटेक्नॉलॉजी) -१ |

२.	उपरोक्त मान्यता शासन निर्णय दिनांक ७.८.२००८ अन्वये बायोटेक्नॉलॉजीच्या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी गठीत समितीने विहीत केलेल्या निकषांच्या पूर्ततेच्या अधिन राहून देण्यात येत आहेत.

३.	नवीन महाविद्यालयातील अ.क्र. १ येथील संस्थेच्या एम.एस्सी बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रमाची मंजूरी ही त्याच संस्थेच्या शैक्षणिक वर्ष २००७-०८ मधील बी.एस्सी. बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रमासाठी शासन गठीत टास्क फोर्स समितीने विहीत केलेल्या निकष पूर्ततेच्या अहवालाच्या अधिन देण्यात येत आहे. संबंधित महाविद्यालयाचा निकषपूर्ती अहवाल सादर न केल्यास त्यांची बी.एस्सी. बायोटेक्नॉलॉजी व एम.एस्सी. बायोटेक्नॉलॉजी या दोन्ही अभ्यासक्रमांसह महाविद्यालयाची मान्यता रद्द करण्यात येतील.

४.	विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

५.	उपरोक्त मान्यता फक्त २ वर्षांपुरतीच (२०१०-११ व २०११-१२) मर्यादित राहील. या दोन वर्षात बायोटेक्नॉलॉजी अभ्यासक्रमासाठी टास्क फोर्स समितीने विहीत केलेल्या सर्व आवश्यक सोयी सुविधा महाविद्यालयाने उपलब्ध करुन दिल्याची खातरजमा संबंधित विद्यापीठ व संबंधित सहसंचालकांनी करुन तसा अहवाल शासनास सादर केल्यानंतरच उपरोक्त बायोटेक्नॉलॉजीच्या मान्यता पुढे सुरु रहातील. समितीने विहीत केलेल्या सोयी सुविधांची पूर्तता महाविद्यालयाने केल्याबाबतचा अहवाल संबंधीत विद्यापीठ व सहसंचालकांनी शासनास सादर न केल्यास सदर मान्यता आपोआप रद्द होतील. विद्यापीठांनी तीस-या वर्षी संलग्नीकरण देताना याबाबत दक्षता घ्यावी.

६.	हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००७१६२००७३४००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सदाशिव शिवदास)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१)	कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य,
२)	संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३)	सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
४)	संबंधित संस्था.
५)	निवड नस्ती (मशि-४)